**डॉ.बाबासाहेब आंबेडकर मुलांचे शासकीय वसतिगृह (जुने), औरंगाबाद इमारत भाडे मंजूरीबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः बीसीएच -२०१५/ प्र.क्र.७५ /शिक्षण-२**

**मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई-४०००३२.**

**दिनांक : ३० मार्च, २०१५.**

वाचा -

१) आयुक्त, समाज कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र :सकआ/ का-५अ/ शिक्षण/ शावगृह/ मुलांचे/ ओरंगाबाद/ २०१५/ ५३१, दि.१२/०३/२०१५.

**शासन निर्णय-**

अनुसूचित जाती मुला-मुलींसाठी शासकीय वसतिगृहे सुरु करण्याचा निर्णय राज्य शासनाकडून घेण्यात आलेला आहे. सदर योजनेंतर्गत अनुसूचित जाती मुलांसाठी औरंगाबाद येथे शासकीय वसतिगृह सुरु करण्यात आले असून, सदर वसतिगृहासाठी औरंगाबाद महानगरपालिकेच्या मालकीची न.भू.क्र.२३३९, तलोणी शिवार हद्दीतील गट नं ३६/ २/ १अ मधील तुपे रोड, संगमनगर वस्ती येथील मिळकत नं ४५१ तळमजला क्षेत्रफळ २९०.९४ चौ.मी. व पहिला मजला २९०.९४ चौ.मी. अशी एकूण ५८१.८८ चौ.मी. क्षेत्रफळ असलेली इमारत शासनाने दि.१.०५.२००३ पासून भाडेतत्वावर ताब्यात घेतली आहे. या इमारतीसाठी कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, औरंगाबाद यांनी दि.१३/०३/२०११ च्या पत्रान्वये दरमहा रु.१,०१,७२०/-फक्त (सर्व कर वगळून) इतके भाडे प्रमाणित करुन दिले आहे.

२.या शासकीय वसतिगृहाकरिता घेतलेल्या इमारतीच्या भाडयाचा तपशिल खालील प्रमाणे आहे :-

| अ. क्र. | इमारत मालकाचेनाव | इमारत | ताबा घेतल्याचा दिनांक | प्रमाणित केलेले भाडे(दरमहा) | क्षेत्रफळ | मंजूर करावयाचे दरमहा एकूण भाडे व कालावधी |
|---|---|---|---|---|---|---|
| १. | औरंगाबाद महानगर पालिका, औरंगाबाद | तळमजला (२९०.९४) व १ला मजला (२९०.९४)<br><br>एकूण - ५८१.८८चौ.मी | दि. १.०५.२००३ | रू.१,०१,७२०/- | ५८१.८८ चौ.मी. | रू. १,०१,७२०/- (सर्व कर वगळून)<br><br>दि. १.०३.२०११ ते दि.३१.०३.२०१५ |

३. वरील प्रमाणे विचाराधीन असलेल्या प्रस्तावावर विचार औरंगाबाद येथील डॉ.बाबासाहेब आंबेडकर मुलांचे शासकीय वसतिगृह (जुने) या शासकीय वसतिगृहासाठी औरंगाबाद महानगरपालिकेच्या मालकीची भाड्याने घेण्यात आलेल्या इमारतीसाठी कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, औरंगाबाद यांनी शिफारस केल्याप्रमाणे दि.१/०३/२०११ ते ३१/०३/२०१५ या कालावधीकरिता दरमहा रु. १,०१,७२०/- ( अक्षरी एक लाख एक हजार सातशे वीस फक्त) सर्व कर वगळून इतके इमारत भाडे मंजूर करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे. मात्र सर्व कर इमारत मालकाने भरणे आवश्यक राहील. तथापि, सदर वसतिगृहासाठी १ मे २००८ पासून नवीन भाडे करारपत्र करण्याच्या अटीच्या अधीन राहून आयुक्त, समाजकल्याण, पुणे यांनी भाडे अदा करण्याची कार्यवाही करावी.

४. गृहपाल, डॉ.बाबासाहेब आंबेडकर मुलांचे शासकीय वसतिगृह (जुने), औरंगाबाद यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर शासकीय वसतिगृहासाठी संपूर्ण भाड्याची रक्कम संबंधितास यापूर्वी अदा केली असेल तर सदर भाडे रक्कम समायोजित करण्याची कार्यवाही त्यांनी नियमानुसार करावी.

५. सदर इमारत मालकास भाडे अदा करताना आयकर विषयक असणाऱ्या "स्त्रोताच्या कपातीबाबत (Tax deducted at source) नियमानुसार योग्य ती कार्यवाही आहरण व संवितरण अधिकारी यांनी करावी.

६. यावर होणारा खर्च हा अर्थसंकल्पित लेखाशिर्ष " सामाजिक न्याय विभाग , मागणी क्रमांक एन-३, २२२५ - अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती व इतर मागासवर्गीयांचे कल्याण (०१) (०१), अनुसूचित जातीतील मुले व मुली यांच्याकरिता असलेल्या शासकीय वसतिगृहांचे परिरक्षण (२२२५ ०२८१) " या

लेखाशीर्षाखाली खर्ची टाकून त्याखाली केलेल्या सन २०१४-१५ या आर्थिक वर्षाच्या तरतूदीमधून भागविण्यात यावा.

७. हा शासन निर्णय वित्त विभाग, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग पहिला, उपविभाग १ ते ५, क्र.विअप्र-१००८/प्र.क्र.७०/२००८/विनिमय, दि.१५ मे, २००९ नुसार प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३३०१५१६५८७१२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Krishnakant Trimbak Kadam

Digitally signed by Krishnakant Trimbak Kadam
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Krishnakant Trimbak Kadam
Date: 2015.03.30 16:25:09 +05'30'

**( कृ.त्रिं.कदम )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१. आयुक्त, समाज कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२. प्रादेशिक उपायुक्त, समाज कल्याण, औरंगाबाद.
३. सहायक आयुक्त, समाज कल्याण, औरंगाबाद.
४. महालेखापाल, महाराष्ट्र -१ ( लेखा परिक्षा) / (लेखा अनुज्ञेयता ) /मुंबई .
५. जिल्हा कोषागार अधिकारी, औरंगाबाद.
६. वित्त विभाग, (व्यय-१४ ) मंत्रालय, मुंबई-३२.
७. उपायुक्त, महानगरपालिका, औरंगाबाद.
८. अवर सचिव (अर्थसंकल्प), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. निवड नस्ती.